**शहिदांचे अंतिम वेतन वार्षिक वेतनवाढीसह देण्याबाबत.**

नक्षलवादी कारवाईसह अतिरेकी कारवाई, दरोडेखोरी, संघटीत गुन्हेगारी विरोधी कारवाई व आपत्कालीन काळात मदत करताना मृत झालेल्या पोलीस अधिकारी / कर्मचारी यांच्या कुटुंबियांना नुकसान भरपाई व इतर सोयी सुविधा देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

शासन निर्णय क्र.पीडब्ल्युएफ १११०/प्र.क्र.६९६/पोल-७

गृह विभाग,मंत्रालय,मुंबई - ४०० ३२.

दिनांक : ०१ जून, २०११.

वाचा :- १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-पीडब्ल्यूएफ-१००३/प्र.क्र.८/पोल-७, दिनांक १६ मार्च, २००५

२) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-पीडब्ल्यूएफ-१००३/प्र.क्र.८/पोल-७, दिनांक ६ जुलै, २००५

३) शासन निर्णय क्र.पीडब्ल्युएफ १००८/प्र.क्र.८/पोल-७, दिनांक २९ नोव्हेंबर, २००८.

४) शासन पूरकपत्र क्र.पीडब्ल्युएफ १००८/प्र.क्र.८/पोल-७, दिनांक २९ ऑगस्ट, २००९.

**शासन निर्णय :-**

अतिरेकी हल्ला, नक्षलवादी कारवाया, दरोडेखोरी, संघटीत गुन्हेगारी विरोधी कारवाई व आपत्कालीन काळात मदत करतांना शहीद झालेल्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटुंबियांना शासनाने सोयी सवलती मंजूर केलेल्या आहेत. या सवलतीपैकी शहिद झालेल्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटुंबियांना शहिद व्यक्तीच्या मृत्यूच्या वेळी देय असलेले अंतिम वेतन त्या शहिद व्यक्तीच्या नियतवयोमानानुसार सेवानिवृत्त होईपर्यंत देय असेल, अशी सवलत आहे. त्याचप्रमाणे शहिद झालेल्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटुंबियांना मृत व्यक्ती जणूकाही मृत झाली नव्हती असे मानून सदर व्यक्तीला सेवेत असतांना, सदर व्यक्ती मृत्युच्यावेळी जे पद धारण करीत होती त्या पदावरुन वरिष्ठ पदावर पदोन्नतीसाठी ज्या ज्या वेळी पात्र असेल त्या त्या वेळी सदर व्यक्ती पदोन्नत झाली असे गृहीत धरुन त्या व्यक्तीची वेतननिश्चिती करण्यात यावी आणि त्यानुसार पदोन्नतीच्या पदावर निश्चित करण्यात आलेले वेतन मृत व्यक्तीच्या नियतवयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत देय राहील, अशी सवलत देण्यात आलेली आहे. अशा प्रकारे जरी सवलती देण्यात आलेल्या असल्या तरी शहिदांना नियमानुसार अनुज्ञेय असलेल्या वार्षिक वेतनवाढी मिळत नसल्याने त्यांच्या कुटुंबियांना कुटुंब निवृत्ती वेतनविषयक लाभापासून वंचित व्हावे लागत आहे. या सर्व बाबींचा साकल्यांने विचार करुन शहिद पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटुंबियांना शहिद पोलीस अधिकारी/कर्मचारी यांचे अंतिम वेतन वार्षिक वेतनवाढीसह देण्यास या शासन निर्णयानुसार मान्यता देत आहे.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.७१४/सेवा-३, दि.६.१२.२०१० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(दि.शा.घाटगे)

कार्यासन अधिकारी, गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महराष्ट्र राज्य, मुंबई.

(कृ.मा.प.)

संचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग (गुन्हे), महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त गुन्हे अन्वेषण विभाग (गुप्तवार्ता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, पोलीस बिनतारी संदेश, महाराष्ट्र राज्य, पुणे
विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई
विशेष पोलीस महानिरीक्षक (नक्षलवादी प्रतिबंधक कारवाया) महाराष्ट्र राज्य, नागपूर
विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
प्राचार्य, पोलीस अकादमी, नाशिक
सर्व पोलीस आयुक्त
सर्व पोलीस महानिरीक्षक (सर्व परिक्षेत्रे, रेल्वे, रा.रा.पो.बल, नागरी हक्क संरक्षण इ.)
सर्व पोलीस अधीक्षक, (जिल्हा, रेल्वे, मोटार परिवहन विभाग पुणे)
सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल
सर्व प्राचार्य, प्रादेशिक पोलीस प्रशिक्षण शाळा
महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकरी
वित्त विभाग (कोषा-५)
सर्व मंत्रालयीन विभाग
सह सचिव अर्थसंकल्प,गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
गृह विभाग (कार्यासन पोल-१ ते पोल-१५, विशा-१/अ, विशा-१/ब ते विशा-८, बीयुडी-१)
निवड नस्ती (पोल-७)